23/4

शासकीय, निमशासकीय इत्यादि सेवेमध्ये मागास-वर्गीयांकरिता असलेल्या विविध सवलती, आरक्षण या आदेशाची अंमलबजावणी करण्यास टाळाटाळ, कुचराई करणा-या अधिका-या/कर्मचा-या विरुध्द शिस्तभंगाची कारवाई.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:- बीसीसी 1093/697/16 ब,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 12 जून, 1995.

वाचा:- 1) परिपत्रक क्रमांक-बीसीसी 1088/2164/प्र.क्र.341/88/16 ब, दिनांक 21.1.1989
2) शासन परिपत्रक क्रमांक-बीसीसी 1086/573/16 ब, दिनांक 12 ऑक्टोबर, 1990.
3) शासन परिपत्रक क्रमांक- बीसीसी 1093/प्र.क्र.125/93/16 ब, दिनांक 28 जुलै, 1993.

परिपत्रक:- शासकीय, निमशासकीय इत्यादी सेवेमध्ये मागासवर्गीयांकरिता सरळ सेवा भरती, पदोन्नतीमध्ये आरक्षण ठेवण्यात आलेले आहे. तसेच मागासवर्गीयांच्या विविध प्रवर्गाकरिता शासकीय, निमशासकीय इत्यादी सेवेमध्ये सवलती देखील देण्यात आलेल्या आहेत. परंतु असे आढळून आले आहे की, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचे काटेकोरपणे पालन केले जात नाही. किंबहुना या आदेशाचे पालन करण्यास टाळाटाळ, कुचराई केली जाते.

2. वर उल्लेखिलेल्या दिनांक 21.1.89, 12.10.90 व दिनांक 28.7.1993 च्या आदेशान्वये अशा प्रकारे आदेशांची अंमलबजावणी करण्यास टाळाटाळ, कुचराई केल्यास संबंधित कर्मचारी/अधिकारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील व तशाप्रकारे कारवाई केली जाईल असे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. या आदेशाची वेळोवेळी पुनरोक्ती करून सर्व संबंधितांच्या नजरेस ही बाब आणण्यात आलेली आहे. तथापि, वेळोवेळी आदेश निर्गमित करुनही त्याची संबंधित अधिकारी दखल घेत नाहीत असे निदर्शनास आले आहे. संबधित कर्मचा-यांनी/अधिका-यांनी मागासवर्गीयांच्या आरक्षणाच्या आदेशाचे अंमलबजावणी करण्याबाबत जी अनास्था दाखविलेली आहे ही बाब खचितच गंभीर असून त्याची शासनाने दखल घेतली आहे. याबाबीचा शासनाने विचार करून खालीलप्रमाणे निदेश देण्यात येत आहेत :-

1) सरळ सेवा भरती, पदोन्नतीमध्ये मागासवर्गीय कर्मचा-यांना हेतूपुरःसर टाळण्याचा प्रयत्न झाला असे निदर्शनास आल्यास संबंधित कर्मचा-या/अधिका-या विरुध्द तात्काळ शिस्तभंगाची कारवाई सुरू करण्यात यावी.

2) 100 बिंदु नामावली, 50 बिंदु नामावली ही वेळच्या वेळी लिहून अद्ययावत करण्यात यावी. त्यावर नियुक्ती प्राधिका-याने प्रमाणित करून सही करणे आवश्यक आहे तसे न झाल्यास संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील व त्यानुसार त्यांच्या विरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात यावी.

3) 100 बिंदु नामावली, 50 बिंदु नामावली अद्ययावत ठेवण्यात आली आहे किंवा कसे तसेच आरक्षणाची अंमलबजावणी अधिका-यांनी केली आहे किंवा कसे याबाबतचे प्रमाणपत्र विभाग प्रमुखांनी संबंधित आस्थापना कार्यासनाच्या अधिका-यांना/कर्मचा-यांना देऊन ते त्यांच्या गोपनीय अहवालास जोडण्यात यावे. अशा प्रकारचे प्रमाणपत्र संबंधित अधिका-यांच्या गोपनीय अहवालात न आढळल्यास त्या अधिका-यांच्या/कर्मचा-यांच्या

पदोन्नतीवर त्याचा विपरीत परिणाम होईल याची संबंधीतांनी नोंद घ्यावी.

4) बरेच अधिकारी/कर्मचारी सक्षम अधिका-यांच्या परवानगीशिवाय राखीव असलेली पदे बिगर राखीव करून भरतात. शासन स्तरावर तसेच विभागीय आयुक्तांच्या कार्यालयातील सहाय्यक आयुक्तांना तपासणीच्या वेळी आरक्षित पदे सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेशिवाय बिगर आरक्षित करण्यात आल्याचे निदर्शनास आल्यास त्याची गंभीर दखल घेऊन संबंधितांविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

3. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, वर उल्लेखिलेले आदेश त्यांच्या अधिपत्याखालील/नियंत्रणाखालील विभाग प्रमुखांना, कार्यालयांना मंडळे, महामंडळे, नगरपालिका, इत्यादींच्या निदर्शनास आणण्यात यावे. याबाबत विभागाने केलेली कार्यवाही/निर्गमित करण्यात आलेले आदेश सामान्य प्रशासन विभाग (मागासवर्ग कक्षात) यांना कळविण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श्री. के. सी. श्रीवास्तव
प्रधान सचिव (सेवा)

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालये, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सचिव, राज्य निवड मंडळ,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र 1/2 (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र 1/2 (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती.

* पत्राने.

एच-709(ए)(3,600-8-95)